महाराष्ट्र राज्य पोलीस दलात पहिल्या टप्प्यात विविध संवर्गात निर्माण केलेल्या १०,४४३ पदांच्या वेतन व इतर खर्चासाठी पुरवणी मागणी मंजूर करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-३६१४/प्र.क्र.१०४/पोल-३

मंत्रालय, जागतिक व्यापार केंद्र, सेंटर-१, कफ परेड,मुंबई-४०० ००५.
दिनांक : २७ फेब्रुवारी २०१५

**वाचा**

१) शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक-अेपीओ-३१११/प्र.क्र.१०७(अ)/पु.बां.२/पोल-३, दिनांक ४ मार्च २०१४

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक-पूरक-२०१४/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३, दिनांक १ जानेवारी २०१५

३) पोलीस महासंचालक, मुंबई यांचे पत्र क्रमांक-पोमसं/२६अ/५२५२/संकीर्ण/७१/२०१४, दिनांक १७ नोव्हेंबर २०१४

**शासन निर्णय**

पोलीस महासंचालक, मुंबई यांच्या अधिनस्त कार्यालयांकरिता पोलीस दलातील विविध संवर्गातील १०,४४३ पदे गृह विभागाच्या दिनांक ४ मार्च २०१४ च्या शासन निर्णयान्वये नव्याने निर्माण करण्यात आल्यामुळे, डिसेंबर २०१४ च्या हिवाळी अधिवेशनात सदर पदांच्या वेतन व इतर खर्चासाठी आवर्ती रु.२१७,२९,७२,४२६/- व अनावर्ती रु.२७,९१,५०,०००/- असा एकूण रु.२४५,२१,२२,६२६/- इतका निधी सन २०१४-१५ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविता येणे शक्य असल्याने, आवश्यक ती तरतूद करण्यासाठी आणि सदरचा खर्च विधानमंडळाच्या निदर्शनास आणून देण्यासाठी, वित्त विभागामार्फत रु.१,०००/- ची लाक्षणिक पुरवणी मागणी सादर करुन, ती विधानमंडळाकडून मंजूर करण्यात आली आहे. तसा महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१४ (सन २०१४ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-३९ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दिनांक २३ डिसेंबर २०१४ यामध्ये प्रसिद्ध करण्यात आला आहे.

२. पोलीस महासंचालक, मुंबई यांच्या अधिनस्त कार्यालयांकरिता पोलीस दलातील विविध संवर्गातील १०,४४३ या नवीन पदांचे वेतन व इतर खर्च खालील लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशीर्ष | उद्दिष्ट | आवर्ती | अनावर्ती | एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मागणी क्र.बी-१, २०५५-पोलीस, | ०१-वेतन | २००,४५,७०,८९७ | --- | **२२६,२८,४६,६९७** |
| | १०९ (००)(०१) जिल्हा पोलीस दल (२०५५०१६८) | ५०-इतर खर्च | --- | २५,८२,७५,८०० | |
| २ | मागणी क्र.बी-१, २०५५-पोलीस, | ०१-वेतन | ५,२१,०३,१९० | --- | **६,११,४४,३९०** |
| | ००३ (००)(०१) शिक्षण व प्रशिक्षण (२०५५००२३) | ५०-इतर खर्च | --- | ९०,४१,२०० | |
| ३ | मागणी क्र.बी-१, २०५५-पोलीस, | ०१-वेतन | ८,०३,०९,१३९ | --- | **८,३३,४५,७८९** |
| | १०१ (००)(०४) गुप्तवार्ता विभाग (२०५५०४३५) | ५०-इतर खर्च | --- | ३०,३६,६५० | |
| ४ | मागणी क्र.बी-१, २०५५-पोलीस, | ०१-वेतन | ३,५९,८९,२०० | --- | **४,४७,८५,५५०** |
| | १११ (००)(०३) रेल्वे पोलीस (२०५५०४४४) | ५०-इतर खर्च | --- | ८७,९६,३५० | |
| | | **एकूण ....** | **२१७,२९,७२,४२६** | **२७,९१,५०,०००** | **२४५,२१,२२,४२६** |

३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-४५/१५/व्यय-७, दिनांक ५ फेब्रुवारी २०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२७१०५६०६०८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: CN = KADAM DATTATRAY HANMANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME DEPT,CID - 918120
Date: 2015.02.27 11:09:44 +05'30'

**द.ह.कदम**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग.

प्रत,

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, वरळी, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, मुंबई.

४. समादेशक, गृहरक्षक व नागरी संरक्षण दल, मुंबई.
५. महासंचालक व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळ, मुंबई.
६. संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
७. सर्व अपर पोलीस महासंचालक.
८. सर्व पोलीस आयुक्त.
९. सर्व विशेष पोलीस महनिरीक्षक.
१०. सर्व पोलीस उपमहानिरीक्षक.
११. सर्व पोलीस अधिक्षक.
१२. सर्व पोलीस प्रशिक्षण विद्यालये.
१३. सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल.
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई/ नागपूर.
१५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८. कक्ष अधिकारी (व्यय-७/अर्थसंकल्प-११) , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. निवडनस्ती- पोल-३